**सन २०१४-१५ मध्ये टंचाई अंतर्गत मौजे तिसगांव, ता.चांदवड येथे ४४ गावे प्रादेशिक योजनेतून तात्पुरती नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१५/प्र.क्र. ११६ /पापु १४**
जी. टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ११ जून, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय पा.पु. व स्व. वि. क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९
२) शासन पत्र क्रमांक टंचाई २०१४/प्र.क्र. ८४/पापु १४, दिनांक ६.०६.२०१५ (बैठकीचे इतिवृत्त)
३) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे क्रमांक जा.क्र. विकास/कार्या-२/२१३३८/१०९३९/२०१५, दिनांक २०.५.२०१५ चे पत्र व प्रस्ताव
४) जिल्हाधिकारी, नाशिक यांचे क्रमांक कक्ष-१३/१/प्र.क्र.५२/टंचाई/७/२४/६४४/२०१५, दिनांक १२.५.२०१५ चे पत्र

प्रस्तावना -

विभागीय आयुक्त, नाशिक यांनी सन २०१४-१५ च्या टंचाई कालावधीसाठी तातडीची पाणी पुरवठा योजनेंतर्गत मौजे तिसगाव, ता.चांदवड येथे ४४ गावे प्रादेशिक योजनेतून तात्पुरती नळ पाणीपुरवठा योजनेचा टंचाई अंतर्गत रुपये २०.१९ लक्ष रक्कमेचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्ताव सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दिनांक ६.०६.२०१५ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला होता.

विभागीय आयुक्त, नाशिक यांच्याकडून मौजे तिसगांव, ता.चांदवड येथे ४४ गावे प्रादेशिक योजनेतून तात्पुरती नळ पाणी पुरवठा याजनेचा रु. २०.१९ लक्ष किंमतीचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला होता. या प्रस्तावात गुरुत्ववाहीनी एकूण ३४२० मी., ११० मि.मी. व्यास, ६ केजी, पीव्हीसी, लांबी ३३०० मी., १०० मि.मी. व्यास, जी.आय.लांबी १२० मी., वॉटर मीटर नग १ यांचा समावेश आहे. स्थायी समितीमध्ये झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने सदर प्रस्तावात प्रस्तावित केलेल्या कामांची एकूण किंमत रु.

२०.१९ लक्ष (रु. वीस लक्ष एकोणीस हजार) इतकी आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

विभागीय आयुक्त, नाशिक यांनी तिसगांव, ता.चांदवड येथे ४४ गावे प्रादेशिक योजनेतून तात्पुरती नळ पाणी पुरवठा योजनेचा प्रस्ताव संदर्भ क्र. ३ च्या पत्रासोबत शासनास सादर केलेला आहे. सदर प्रस्तावात प्रस्तावनेत नमूद केलेल्या कामांचा समावेश असलेल्या रु. २०.१९ लक्ष (रुपये वीस लक्ष एकोणीस हजार फक्त) किंमतीच्या प्रस्तावास स्थायी समितीने दिनांक ६.०६.२०१५ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने या आदेशान्वये मौजे तिसगांव, ता.चांदवड येथे ४४ गावे प्रादेशिक योजनेच्या कामांच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी, नाशिक यांनी तिसगांव व चांदवड तालुक्यातील ४४ गावांत पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्व प्रथम घोषित करणे.
२) सदर प्रस्तावात नमूद केलेली सर्व सुधारणात्मक कामे कार्यकारी अभियंता, जिल्हापरीषद नाशिक यांचेमार्फत करणे आवश्यक राहील.
३) सदर योजनेचे काम प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे टंचाई कालावधीच्या आत तातडीने पूर्ण करावे. अन्यथा योजनेची मान्यता आपोआपच व्यपगत होईल.
४) विभागीय आयुक्त, नाशिक यांनी सदर योजनेकरिता निविदा प्रक्रिया झाल्यानंतर योजनेच्या सुरुवातील ५०% इतका निधी द्यावा. उर्वरित निधी योजना कार्यान्वित झाल्यानंतर देण्यात यावा.
५) सदर योजनेची प्रस्तावात नमूद कामे जिल्हा परीषद नाशिक यांचेकडून पूर्ण करण्यात आल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती व योजनेचे व्यवस्थापन जिल्हा परिषद, नाशिक यांनी करणे बंधनकारक राहील.

२. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) पिण्याच्या पाण्याच्या आकस्मिक निकडीच्या पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर) - ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी सचिवस्तरीय स्थायी समिती स्थापन केली असून सदर

समितीच्या दिनांक ६/६/२०१५ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१११५२९५१६२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.06.11 16:46:53 +05'30'

**(म. भ. सावंत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा व परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा व परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७. विभागीय आयुक्त, नाशिक
८. जिल्हाधिकारी, नाशिक
९. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण, नाशिक
१०.अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण, नाशिक
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, नाशिक
१२.कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण नागरी व ग्रामीण विभाग, नाशिक
१३.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, नाशिक
१४. मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१५.उप सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१६.पापु १४ (निवडनस्ती)